**लोक प्रतिनिधींनी दिलेल्या निवेदनांवर/तक्रारींवर करावयाची कार्यवाही तसेच कार्यालयीन <u>कामकाजाकरिता अभ्यागतांना भेटण्याबाबत</u>.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : विपआ-२०१६/प्र.क्र.२६५/प्रशा-३**
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
दिनांक: १५ नोव्हेंबर,२०१६.

**<u>शासन परिपत्रक:-</u>**

सन २०१५ च्या तिसऱ्या हिवाळी अधिवेशनात विधान परिषदेत ठाणे जिल्हा परिषदेतील शिक्षण विभागाशी संबधित उपस्थित झालेल्या विधान परिषद तारांकित प्रश्न क्र.१२६१८ मध्ये मा.मंत्री महोदयांनी दिलेल्या आश्वासन क्र.३२६, ३२७ व ३२९ च्या अनुषंगाने मा. विधान परिषद आश्वासन समिती प्रमुखांनी प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा यांची साक्ष घेतांना सूचना दिल्या आहेत. शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील राज्यस्तरीय व सर्व क्षेत्रिय कार्यालय प्रमुखांनी खालील सूचना विचारात घेऊन त्याची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावयाची आहे.

१) मा.लोकप्रतिनिधींनी कोणत्याही विषयावर दिलेली तक्रार/निवेदन इत्यादी बाबतचे उत्तर सदर तक्रार/निवेदन संबधित कार्यालयाला प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून पुढील १० दिवसांच्या आत संबधित लोकप्रतिनिधी यांना याबाबत केलेल्या कार्यवाहीची माहिती देण्यात यावी.

२) राज्यस्तरीय व क्षेत्रिय अधिकारी यांनी त्यांच्याकडे प्राप्त तक्रारी/निवेदनांचा आढावा घेऊन गैरव्यवहार/ अनियमिततेच्या अनुषंगाने संबधित अधिकारी/कर्मचारी यांच्या विरुध्द तातडीने कारवाई करावी. तसेच असे गैरव्यवहार किंवा अनियमितता त्यांच्या कार्यालयात होणार नाही याबाबत त्यांच्या कार्यालयीन स्तरावर प्रभावी उपाययोजना करावी व सर्व प्रकारची दक्षता घ्यावी. सदर अहवाल सादर करतांना झालेल्या अनियमिततेबाबत सविस्तर व तपशीलवार माहिती देवून अनियमितता झालेल्या, नियमांचे उल्लघंन करुन देण्यात आलेल्या संचमान्यता, वैयक्तिक मान्यता, अनुज्ञेय नसलेली वेतनश्रेणी देणे इत्यादी सर्व प्रकारच्या अनियमिततेबाबत त्रैमासिक अहवाल वरिष्ठ कार्यालयास सादर करावा.

३) संबधित सर्व कार्यालय प्रमुखांना सूचित करण्यात येते की, त्यांनी व त्यांच्या कार्यालयातील कोणत्याही अधिकारी/ कर्मचारी यांनी कामकाजाकरीता भेटावयास येणाऱ्या सर्व अभ्यागत व इतर नागरिक यांना ठरवून दिलेल्या कार्यालयीन वेळेतच भेटावे तसेच याबाबतची सूचना ठळक अक्षरात फलकावर लावावी. सदर सूचनेचे काटेकोर पालन करावे.

महाराष्ट्र नागरी सेवा ( वर्तणूक ) नियम १९७९ मध्ये शासकीय कर्मचाऱ्यांची वर्तणूक व कर्तव्ये याबाबत स्पष्ट नियम आहेत, त्यांचे पालन करणे आवश्यक आहे. अन्यथा महाराष्ट्र नागरी सेवा ( शिस्त व अपिल) नियम १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल याची जाणीव प्रत्येक कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या अधिपत्याखालील असलेल्या सर्व अधिकारी/कर्मचारी यांना करुन दयावी व स्वत:ही या सर्व बाबींचे काटकोर पालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११६१५१५००८६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2016.11.16 15:18:15 +05'30'

(र.प्र.आटे)
सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त शिक्षण, आयुक्त शिक्षण यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च मध्य.) महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) शिक्षण संचालक (प्रौढ शिक्षण व अल्पसंख्याक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक, महाराष्ट्र राज्य, शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.
६) संचालक, महाराष्ट्र राज्य, पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, (राज्य मंडळ) पुणे.
७) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य, परिक्षा परिषद, पुणे.
८) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ (राज्य मंडळ) पुणे.
९) संचालक, राज्य शैक्षणिक तंत्र तंत्रज्ञान, "बालचित्रवाणी" आगरकर मार्ग, पुणे-४११ ००४.
१०) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र राज्य, प्राथमिक शिक्षण परिषद, जवाहर बालभवन, चर्नीरोड, मुंबई- ४०० ००४.
११) संचालक, महाराष्ट्र राज्य, शैक्षणिक नियोजन व प्रशासन संस्था, (निपा) जिल्हा परिषद, मल्टी परपज हायस्कूल परीसर भडकल गेट, औरंगाबाद.
१२) संचालक (क्रीडा व युवक सेवा) महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) सर्व शिक्षणाधिकारी/सर्व गट शिक्षणाधिकारी/ सर्व अधिक्षक (म.शि.से व सा. रा. से)
१४) सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) मा. समिती प्रमुख, विधान परिषद आश्वासन समिती यांचे स्वीय सहायक.
१६) निवड नस्ती (प्रशा-३)